**उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर "अतिरिक्त विकास आयुक्त" या भारतीय प्रशासन सेवेतील एका पदासह एकूण ४ नियमित पदे निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- इएसटी-३४१८/प्र.क्र.६२/उद्योग-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ११ फेब्रुवारी, २०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र: असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र: असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-२)/२००२/वित्तीय सुधारणा, दि.२६.०२.२००२.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१०/८४/१०/विसु-१, दि.२७.९.२०१०
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि.०२.०२.२०१३
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/विसु-१, दि.०२.१२.२०१३
६) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.२९/१६/विसु-१, दि.०२.०८.२०१६
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि. ११.०२.२०१६.
८) भाप्रसे (वेतन) नियम २०१६
९) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.: पदनि-०६१७/प्र.क्र.२०/ आ.पु.क, दि. ०९.०६.२०१७.
१०) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.: पदनि-०६१७/प्र.क्र.२०/ आ.पु.क, दि. २९.०६.२०१७.
११) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.: इएसटी-३४१६/प्र.क्र.६९/ उद्योग-३, दि. ०७.११.२०१९.
१२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.२४/२०/आपुक, दि.३०.९.२०२०

**प्रस्तावना -**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १, २, ७ व १० येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याचे निर्देश देण्यात आले होते. त्यानुसार संदर्भ क्र.१० येथील वित्त विभाग शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सुचनांच्या आधारे उद्योग संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील दि. ०१.०६.२०१७ च्या स्थितीस अनुसरुन पदांचा आढावा घेण्यात आला असून संदर्भ क्र. ९ येथील वित्त विभाग शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या उप समिती तथा छाननी समितीच्या दि. ३१.०५.२०१९ रोजीच्या बैठकीत एकूण ९९५ पदांचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. यामध्ये भारतीय प्रशासन सेवेतील एका पदांसह १५ नवीन पदे व १२५ बाह्यंत्रणेच्या पदांचा समावेश होता. तथापि, छाननी समितीने नवीन पदे निर्माण करण्यासाठीचा प्रस्ताव स्वतंत्ररित्या सादर करण्याचे निर्देश देऊन उद्योग संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयासाठी सादर केलेल्या ९९५ सुधारित पदांच्या तुलनेत एकूण ९२८ पदांना (११७ बाह्ययंत्रणेच्या पदांसह) मान्यता दिली असून सदर प्रस्ताव संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्याचे निर्देश दिले होते. त्याप्रमाणे उक्त प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.८.०७.२०१९ रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला. उच्चस्तरीय सचिव समितीने उद्योग संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात विविध संवर्गात एकूण ९२८ (११७ बाह्ययंत्रणेच्या पदांसह) पदांना मान्यता दिली आहे. त्याप्रमाणे ११७ बाह्ययंत्रणेच्या पदासह एकूण ९२८ पदांचा सुधारित आकृतीबंध संदर्भ क्रमांक ११ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आला आहे.

नवीन पद निर्मितीसाठी स्वतंत्र प्रस्ताव सादर करण्याबाबत छाननी समितीने दिलेल्या उपरोक्त निर्देशास अनुलक्षून अतिरिक्त विकास आयुक्त या भारतीय प्रशासन सेवेतील एका पदासह एकूण २१ पदांचा प्रस्ताव दि. १५.७.२०२१ च्या छाननी समितीच्या बैठकीत सादर केला असता, सदर समितीने अतिरिक्त विकास आयुक्त (वेतनश्रेणी-३७४००-६७०००+ग्रेड पे ८७००) या भारतीय प्रशासन सेवेतील एका पदासह एकूण ४ नवीन नियमित पदे निर्माण करण्यास व ४ मनुष्यबळ बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यास मान्यता दिली. तद्नंतर सदर प्रस्ताव दि. २६.८.२०२१ रोजीच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला. उच्चस्तरीय सचिव समितीने विभागाच्या उक्त प्रस्तावास छाननी समितीने दिलेल्या मान्यतेप्रमाणे भारतीय प्रशासन सेवेतील एका पदासह एकूण ४ नवीन नियमित पदे निर्माण करण्यास व ४ मनुष्यबळ बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यास मान्यता दिली व अतिरिक्त विकास आयुक्त या भारतीय प्रशासन सेवेतील पदाचे ग्रेड वेतन रु.७६००/- पेक्षा जास्त असल्यामुळे त्यास संदर्भ क्रमांक ९ येथील शासन निर्णयाप्रमाणे मंत्रीमंडळाची मान्यता घेण्याचे निर्देश दिले. त्यानुसार सदर प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या दि.१०.११.२०२१ च्या बैठकीसमोर ठेवून त्यास मान्यता घेण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर नियमित ४ पदांसह बाह्ययंत्रणेच्या ४ मनुष्यबळास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १, २, ७ व १० येथील शासन निर्णयानुसार उद्योग संचालनालय (खुद्द) व त्यांच्या अधिनस्त कार्यालयाकरिता नवीन पदनिर्मिती करण्याबाबत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या दि.२६.८.२०२१ रोजीच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत “अतिरिक्त विकास आयुक्त” या पदासह एकूण ४ नियमित पदे निर्माण करण्यास व ४ मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यासाठी मान्यता प्राप्त झाली आहे. या नवीन पदांपैकी अतिरिक्त विकास आयुक्त या भारतीय प्रशासन सेवेतील पदाचे ग्रेड वेतन रु. ७६००/- पेक्षा जास्त असल्यामुळे त्यास संदर्भ क्रमांक ९ येथील शासन निर्णयाप्रमाणे मंत्रीमंडळाची मान्यता घेण्याचे उच्चस्तरीय सचिव समितीचे निर्देश होते. त्यानुसार विभागाचा सदर प्रस्ताव दि.१०.११.२०२१ रोजीच्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत सादर करुन त्यास मान्यता घेण्यात आली आहे. सदर मान्यतेच्या आधारे खालील **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार अतिरिक्त विकास आयुक्त हे भारतीय प्रशासन सेवेतील एक पद निर्माण करण्यास, **विवरणपत्र-ब** मध्ये दर्शविल्याप्रमाणे अन्य ३ नियमित पदे निमार्ण करण्यास व **विवरणपत्र-क** येथील एकूण ४ मनुष्यबळ बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

### विवरणपत्र -अ

| अ.क्र. | विभागाचे/कार्यालयाचे नाव | पदनाम | संवर्ग | सहावा वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | मंजुर पद संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | उद्योग संचालनालय, मुंबई (मैत्री कक्ष कार्यालय) | अतिरिक्त विकास आयुक्त | भा.प्र.से. | ३७,४००-६७,००० + ग्रेड वेतन ८,७००/- | भा.प्र.से.वेतन मॅट्रीक्स स्तर १३ (१,२३,१०० - २,१५,९००) | १ |

## विवरणपत्र- ब

| अ.क्र. | विभागाचे/कार्यालयाचे नाव | पदनाम | संवर्ग | सहावा वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | मंजुर पद संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | उद्योग संचालनालयासाठी कृषी विभागातील पद | कृषी उप संचालक | गट-अ | १५६००-३९१००+ग्रेड पे ५४००/- | एस-२०: ५६१००-१७७५०० | १ |
| २. | मैत्री कक्ष कार्यालय | सहाय्यक लेखा परीक्षा अधिकारी | गट-ब | ९३००-३४८००+ग्रेड पे ४४००/- | एस-१५: ४१८००-१३२३०० | १ |
| ३. | मुंबई प्राधिकरण विभाग, मुंबई | | | | | १ |

## विवरणपत्र-क

| अ.क्र | विभागाचे/कार्यालयाचे नाव | बाह्ययंत्रणेच्या सेवा | मानधन | मनुष्यबळ |
|---|---|---|---|---|
| १. | मैत्री कक्ष कार्यालय | स्वीय सहाय्यक | वित्त विभाग परिपत्रक दि.२७.९.२०१०, दि.०२.०२.२०१३, दि.०२.१२.२०१३, दि.२.८.२०१६ व दि.३०.९.२०२० मधील तरतुदीनुसार | १ |
| २. | उद्योग संचालनालय, मुंबई | लघुटंकलेखक | | १ |
| ३. | जिल्हा उद्योग केंद्र, अहमदनगर | | | १ |
| ४. | जिल्हा उद्योग केंद्र, गोंदिया | | | १ |
| **एकूण मनुष्यबळ** | | | | **४** |

२. उपरोक्त **विवरणपत्र-क** मध्ये दर्शविल्यानुसार एकूण ४ पदे वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३, ४, ५, ६, व १२ येथील परिपत्रकातील तरतुदीनुसार बाह्ययंत्रणेद्वारे भरण्याची व त्यांना अनुज्ञेय असलेल्या मानधनाची तरतुद करण्याची कार्यवाही उद्योग संचालनालयामार्फत करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५८५/ आपुक, दि.१३.१२.२०२१ तसेच ३४२/२०२१/सेवा-९, दि.१७.१२.२०२१ व सामान्य प्रशासन विभाग अनौ.संदर्भ क्र.१/२०२२, दि.३.२.२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत असून सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे व त्याचा सांकेतिक क्रमांक २०२२०२१११७४३०८३५१० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92,
pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B,
serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2022.02.11 18:35:10 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

**विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र शासन यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.विरोधी पक्ष नेता (विधानपरिषद/विधानसभा).
३. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई.
९. महालेखापाल ( लेखा परिक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२, महाराष्ट्र, नागपूर.
११. महालेखापाल ( लेखा) - २, महाराष्ट्र, नागपूर.
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१४. सह सचिव / उप सचिव (वित्तीय सुधारणा/आपुक/साप्रवि-९-अ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सर्व सह सचिव/ उप सचिव, उद्योग, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. उप सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. संचालक (लेखा व कोषागारे), फोर्ट, मुंबई
१९. संचालनालय (लेखा व कोषागारे), फोर्ट, मुंबई.
२०. उद्योग सह संचालक , सर्व विभागीय कार्यालये.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. सर्व महाव्यवस्थापक/ व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र.
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२१. उद्योग संचालनालयातील शासन मान्यताप्राप्त अधिकारी/ कर्मचारी संघटना.
२२. निवडनस्ती (उद्योग-३).